**तीर्थक्षेत्रांची निवड करणे आणि तीर्थक्षेत्र विकास योजनांचे आराखडे मंजूर करणे याबाबतचे निकष ठरविणेबाबत .......**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :** तिक्षेवि-२००२/५६८/प्र.क्र.८९/२००२/नवि-१८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २००४

**वाचा :** शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-१०९७/२०५५/नवि-१८, दिनांक २५/८/१९९७.

**प्रस्तावना :**

राज्यातील अनेक तीर्थक्षेत्रांच्या / यात्रास्थळांच्या ठिकाणी भेट देणाऱ्या यात्रेकरुंची संख्या फार मोठ्या प्रमाणात असते. बऱ्याच तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी वर्षामधील काही ठराविक कालावधीमध्ये मोठ्या संख्येने यात्रेकरु भेट देतात. अशी तीर्थक्षेत्रे/ यात्रास्थळे ज्या स्थानिक नागरी संस्थांच्या क्षेत्रात आहेत त्यांना अशा मोठ्या संख्येने येणाऱ्या यात्राकरुंना पुरेशा प्रमाणात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करणे साधन संपत्तीच्या मर्यादेमुळे अडचणीचे होते व पर्यायाने यात्रेकरुंना गैरसोय सोसावी लागते. या परिस्थितीचा विचार करुन प्रमुख तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी येणाऱ्या भाविकांसाठी आवश्यक मुलभूत सोयी पुरविण्यासाठी व त्याअनुषंगाने आवश्यक विकासाची कामे नागरी स्थानिक संस्थांच्या हद्दीत येणाऱ्या तीर्थक्षेत्रांच्या बाबतीत शासनाने आतापर्यन्त २१ योजना मंजूर केलेल्या आहेत. ग्रामीण क्षेत्रामध्ये येणाऱ्या तीर्थक्षेत्रांच्या मंजूरीबाबतचे प्रस्ताव ग्राम विकास विभागाकडून हाताळले जातात.

तीर्थक्षेत्र व परिसर आणि पर्यटन क्षेत्राच्या विकासाबाबत किमान निकष संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २५/८/९७ अन्वये मंजूर करण्यात आले होते. तथापि, तीर्थक्षेत्र विकास योजनेच्या संदर्भात सविस्तर निकष शासनाचे धोरण म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील नागरी / ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्रांची निवड करणे आणि तीर्थक्षेत्र विकास योजनांचे आराखडे मंजूर करणे तसेच तत्संबंधी निधी उपलब्ध करणे यासाठी खालीलप्रमाणे निकष नॉर्म्स मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. :-

१) राज्यातील अतिमहत्वाचे प्रसिध्द असे देवस्थान असावे, त्या ठिकाणी वर्षातून किमान एक व त्यापेक्षा जास्त वेळा यात्रा भरणे व सदर यात्रेसाठी लाखोंच्या संख्येने भाविक उपस्थित असले पाहिजेत.

२) ग्रामदवता सारख्या दवस्थानांचा, राष्ट्रीय किंवा ऐतिहासिक स्मारकाचा / समाधीस्थळांचा या योजनेत समावेश करता येणार नाही.

३) तीर्थक्षेत्राचे / देवस्थानाची निवड करतांना संबंधीत जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्तांच्यामार्फत तीर्थक्षेत्राचे "अ" , "ब" व "क" असे तीन श्रेणीमध्ये वर्गीकरण करावे व त्यापैकी एका श्रेणीमध्ये संबंधीत यात्रास्थळाचा / देवस्थानाचा समावेश करुन अभिप्रायासह प्रस्ताव शासनाकडे निकष समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

अ] "अ" श्रेणी तीर्थक्षेत्रे म्हणजे राष्ट्रीय व आतंरराष्ट्रीय किर्तीची ठिकाणे केंद्र शासन/ परराष्ट्राकडून मिळणाऱ्या अर्थसहाय्याने विकसित करण्यात येणारी ठिकाणे.

ब] "ब" श्रेणी तीर्थक्षेत्रे म्हणजे राज्यस्तरावरील महत्वाची ठिकाणे राज्याच्या अर्थसंकल्पीय साधन संपत्ती मधून विकसित करण्यात येणारी स्थळे यामध्ये शासनाने राज्यस्तरावर व वैधानिक विकास मंडळाकडून तरतूद करुन विकसित करावयाची ठिकाणे.

क] "क" श्रेणी तीर्थक्षेत्रे म्हणजे जिल्हास्तरावर स्थानिक महत्व असलेली ठिकाणे जिल्हा नियोजन व विकास मंडळाने उपलब्ध केलेल्या तरतूदींमधून विकसित करण्यात येणारी ठिकाणे.

४) "ब" श्रेणीतील स्थळांच्या बाबतीत तीर्थक्षेत्राच्या आराखड्याच्या एकूण खर्चाच्या ५० टक्के रक्कम शासनाने, २५ टक्के रक्कम संबंधीत स्थानिक नागरी संस्थेने व २५ टक्के रक्कम संबंधीत मंदिराच्या ट्रस्टने खर्च करणे आवश्यक राहील, तसेच "क" श्रेणीतील क्षेत्राबाबत हेच प्रमाण ७५ : १२.५, १२.५% असे राहील, असे असेल तरच प्रस्तावावर विचार करता येईल. सदरची अट ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्रासाठी लागू असणार नाही.

५) राज्यातील महानगरपालिका/ नगरपालिका/ ग्रामपंचायत अधिकार क्षेत्रातील तीर्थक्षेत्रांचा प्रस्ताव सादर करतांना यात्रेकरुंच्या भेटीचे प्रमाण सध्या तेथे असलेल्या गैरसोयी याची माहिती जिल्हाधिकाऱ्यांनी प्रस्तावात समाविष्ट करणे आवश्यक आहे.

६) तीर्थक्षेत्र विकासांतर्गत जी कायमस्वरुपी मालमत्ता उभी होणार आहे. उदा.धर्मशाळा वगैरे यांची देखभाल दुरुस्ती इत्यादी ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद/ नगरपालिका/ मंदिराचे ट्रस्ट यांनी करणे आवश्यक आहे व त्यांच्याकडून ठरावाद्वारे लेखी हमीच्या अटीवरच प्रस्ताव मंजूर करावा. देखभाल दुरुस्तीसाठी शासनाकडून कुठलाही निधी देता येणार नसल्याने देखभाल दुरुस्ती संबंधीत स्थानिक नागरी संस्थेने किंवा संबंधीत मंदिराच्या ट्रस्टने करणे आवश्यक राहील तसा ठराव संबंधीत यंत्रणेबरोबर करण्यात यावा. तीर्थक्षेत्राची कामे ही शक्यतो शासकीय जमिनीवरच असावी. त्यात भूसंपादनाची बाब नसावी. मंदिराच्या आवारातील कामे संबंधीत ट्रस्टने करावीत.

७) तीर्थक्षेत्र विकासाच्या निधीतून संपूर्ण शहराचा विकास करणे अभिप्रेत नाही. नागरी सुविधा पुरविणे ही संबंधीत स्थानिक नागरी संस्थेची जबाबदारी असल्याने विकास कामासाठी स्थानिक नागरी संस्था, मंदिर ट्रस्ट, स्थानिक विकास कार्यक्रम, वैधानिक विकास मंडळ

इत्यादी स्त्रोतामधून निधी उपलब्ध करणेबाबत जिल्हाधिकाऱ्यांनी विचार करणे आवश्यक आहे.

८) तीर्थक्षेत्र विकासाचा वार्षिक नियोजन आराखडा तयार करतांना चालू असलेली कामे ८०% पूर्ण झाल्याशिवाय कोणत्याही नवीन तीर्थक्षेत्राचे काम प्रस्तावित करु नये.

९) संबंधीत स्थळांचा तीर्थक्षेत्र विकास योजनेतील कार्यक्रमातील कामांच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च विचारात घेऊन तेथे येणाऱ्या भाविकांसाठी युजर चार्जेस/ सेवा शुल्क लागू करुन त्यातून मिळणाऱ्या निधीचा वापर संबंधीत स्थानिक नागरी संस्थेने (महानगरपालिका/ नगरपालिका/ ग्रामपंचायत) भाविकांसाठी मुलभूत नागरी सुविधा पुरविण्यासाठी करावा.

१०) संबंधीत तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी कोणती कामे घ्यावीत याबाबतचे शासनाचे दि.२५/८/९७ चे आदेशातील धोरण कायम राहील. ( सुलभ संदर्भासाठी सदर शासन निर्णयातील संबंधित बाबी खाली नमूद करण्यांत येत आहे.)

१) पिण्याच्या पाण्याची योजना संबंधीत विभागाच्या नियतकालीन योजनांच्या नियमांतर्गत करण्यात यावी.

२) जलनि:सारण किंवा गटारांची योजना संबंधित विभागाच्या नियतकालीन योजनांतर्गत करण्यात यावी. परंतु त्यांची अग्रक्रमाचे अंमलबजावणी करण्यात यावी.

३) मंदिर किंवा तिर्थक्षेत्र यांचे व्यवस्थापन हे एखाद्या ट्रस्टमार्फत होत असल्यास त्याच्या जागेवर मंदिरात किंवा तीर्थक्षेत्रात शासनाच्या निधीतून करावयाचा खर्च शासनाच्या विनिर्दिष्ट मान्यतेशिवाय करु नये.

४) धर्मशाळा शासकीय जागेवर प्रस्तावित असल्यास ती प्रमाणशीर असावी एखाद्री संस्था त्याचे व्यवस्थापन करण्यास तयार असेल त्याचाही विचार व्हावा.

५) तिर्थक्षेत्र व पर्यटन क्षेत्राचा विकास करताना त्या ठिकाणी वाहनांच्या पार्किंगसाठी पुरेशी जागा आणि छोटी बाग या सोयी असाव्यात.

६) सुलभ शौचालयाच्या धर्तीवर स्वच्छतागृहांची व्यवस्था करण्यात यावी.

७) गावातील एस.टी. स्थानक किंवा रेल्वे स्थानकापासून तीर्थक्षेत्राकडे जाणा-या रस्त्याचा विकास करण्यात यावा.

८) वरील क्रमांक (१) व (२) येथील नियमांच्या निकषात बसत नसतील तर त्यासाठी परिस्थितीनुसार संबंधित निकष शिथिल करण्यात यावेत.

०२. राज्यातील विविध तीर्थक्षेत्रांच्या विकासाबाबत प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची संबंधीत जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांनी निकषाप्रमाणे छाननी करावी आणि त्यानुसार प्रस्तावातील कामाबाबत शिफारस करावी. शासन स्तरावर देखील प्रस्तावाची छाननी सदर निकषाप्रमाणे करण्यात यावी.

०३. हा शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक १५२/व्यय-३ दिनांक २५.०२.२००४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( फ. ब. खान )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (व्यय),वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रतीसह )
सचिव, गृह विभाग (पर्यटन), मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
संचालक, नगररचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे
आयुक्त व संचालक, नगरपालिका प्रशासन,, वरळी, मुंबई-२५ (५ जादा प्रतीसह )
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व आयुक्त, महानगरपालिका
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्याधिकारी नगरपरिषद
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग
निवडनस्ती (नवि-१८).